राज्यातील जिल्हयात भेटी देणाऱ्या मा.राज्य अतिथी, अति अति महत्वाच्या व्यक्ती व इतर मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेसाठी नविन वाहने खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांक- डीव्हीसी-२०१६/प्र.क्र.१७२/का.३१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ मार्च, २०१७.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. डिव्हीसी-१०१५/प्र.क्र.९८/३१, दि. २३.०२.२०१७.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन २०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दि. ०८.०५.२०१४

**प्रस्तावना:-**

जिल्हयास भेटी देणाऱ्या अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी व इतर मान्यवर यांच्या परिवहनासाठी प्रत्येक जिल्हाधिकारी कार्यालयातील राजशिष्टाचार कक्षाकडे डी. व्ही. वाहनांचा ताफा ठेवण्यात येतो. सदर डी. व्ही. वाहनांचे परिरक्षण (देखभाल दुरूस्ती व इंधन खर्च) व नविन वाहने खरेदी करण्याची बाब ही सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार) या विभागाच्या अखत्यारित येते. राज्यात असलेली काही डी. व्ही. वाहने ना-दुरूस्त असल्याने व त्यांचे आयुष्यमान संपल्याने ती निर्लेखित करण्यात आली आहेत. सदर वाहनांच्या ऐवजी नविन वाहने खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्याकरिता नविन वाहने खरेदी करण्यासाठी राज्यतील सर्व डी. व्ही. वाहनांचा सुधारित आढावा घेणे आवश्यक होते. त्याअनुषंगाने, सर्व जिल्हयातील डी. व्ही. वाहनांचा सुधारित आढावा मंजूर करण्याबाबत व ७२ निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदीस मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीसमोर सादर करण्यात आला होता. राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने सर्व जिल्हयांकरिता एकूण २२५ डी. व्ही. वाहनांचा आढावा मंजूर केला असून त्याबाबतचा शासन निर्णय संदर्भाधिन क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आला आहे. निर्लेखित केलेल्या वाहनामुळे, राज्यातील जिल्हयात भेटी देणाऱ्या मा. राज्य अतिथी व इतर मान्यवरांची वाहनाअभावी गैरसोय व अडचण निर्माण होत होती. सध्या जिल्हाधिकारी कार्यालयामधील राजशिष्टाचार कक्षातील २५ निर्लेखित केलेल्या डी.व्ही. वाहनाच्या बदली २४ नविन डी. व्ही. वाहने खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

जिल्हयास भेटी देणाऱ्या अति-अति महत्वाच्या व्यक्ती, राज्य अतिथी व इतर मान्यवर यांच्या परिवहनासाठी राज्यस्तरीय वाहन धोरण आढावा समितीने एकूण २२५ वाहना आढावा मंजूर केलेला आहे. त्यापैकी ९ जिल्हाधिकारी कार्यालयामधील राजशिष्टाचार कक्षातील २५ निर्लेखित केलेल्या डी. व्ही. वाहनाच्या बदली २४ नविन डी. व्ही. वाहने ही (टोयाटो इनोव्हा क्रिस्टा या प्रकारची Model No. INNOVA CRYSTA 2.4 Z PACAKAGE: 7 SEATER)) मे. टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रा. लि. या उत्पादक कंपनीकडून **"एकलस्त्रोत"** पध्दतीने खरेदी करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर २४ वाहने खरेदी करण्यासाठी खालील तक्तयात नमूद केल्याप्रमाणे येणाऱ्या एकूण **रू. ४,६४,९९,७३३/- (एकूण रूपये चार कोटी चौसष्ट लक्ष नव्याण्णव हजार सातशे तेहतीस फक्त ) (व्हॅटसह) एवढया खर्चास या शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.**

| Sr. No. | Model No. | Details | Rate (Single Unit | Quantity (No. of Cars) | Total Amount Rs |
|---|---|---|---|---|---|
| 1 | INNOVA CRYSTA 2.4Z PACAKAGE: 7 SEATER | Basic Price | 12,73,005 | **24** | 4,64,99,733.43 |
| | | Excise Duty @ 27.00% | 343711 | | |
| | | Auto Cess 1.12500% | 14,321 | | |
| | | Infrastructure Cess 4.0% | 50,920 | | |
| | | CST @ 14.50% | 2,43.88 | | |
| | | Friegt till Rajyog Latur | 10,969 | | |
| | | Transit Insurance | 678 | | |
| | | **Total (TKM Invoice Price)** | **19,37,488.89** | | |
| | | | | | 4,64,99,733.43 |
| | **Total (Rs Four Crore Sixty Four Lakh Ninety Nine Thousand Seven Hundred Thirty Three Only)** | | | | 4,64,99,733.43 |

२. तसेच उक्त २४ वाहने संबंधित जिल्हयात पोहोच करण्यासाठी मे. टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रा. लि. मुंबई या कंपनीचे अधिकृत पुरवठादार मे. राजयोग टोयाटो, लातूर या पुरवठादाराची नियुक्ती करण्यात आली आहे. त्याकरिता सदर वाहने लातूर ते संबंधित जिल्हयात पोहोच करण्यासाठी खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मे. राजयोग टोयाटो, लातूर या पुरवठादाराकडून प्राप्त झालेल्या एकूण रू. १,७०,३६०/- इतक्या रकमेच्या देयकाच्या खर्चास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | वाहनाची संख्या | वाहतूकीसाठी येणारा एकूण खर्च |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **४** | **६** |
| १ | सोलापूर | १ | २५०० |
| २ | जळगांव | ३ | २५२०० |
| ३ | औरंगाबाद | ४ | २२८०० |
| ४ | बीड | २ | ५९२० |
| ५ | लातूर | १ | ० |
| ६ | चंद्रपूर | ३ | २६९४० |
| ७ | नागपूर | ५ | ४६८०० |
| ८ | गोंदिया | १ | १३८०० |
| ९ | यवतमाळ | ४ | २६४०० |
| | | **२४** | **१,७०,३६०** |

**३. वरील परिच्छेद २ व ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वाहन खरेदीची रक्कम रू. ४,६४,९९,७३३/-+ वाहने पोहोच करण्यासाठी येणारा खर्च रू. १,७०,३६० अशी एकूण रू. ४,६६,७०,०९३/- (रूपये चार कोटी सहासष्ट**

<u>**लाख सत्तर हजार त्र्याणव फक्त) इतक्या रकमेच्या खर्चाचे देयक संक्षिप्त देयकावर काढण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.**</u>

५. उपरोक्त वाहनांच्या खरेदीसाठी होणारा खर्च भागविण्यासाठी संक्षिप्त देयकाद्वारे रक्कम आहरित करण्यास वित्त विभाग ( विनियम कार्यासन) यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२०/२०१७, विनियम दि. २४.०३.२०१७ अन्वये खालील अटींच्या अधिन राहून मान्यता दिली आहे.

(१) शासन परिपत्रक क्र. मुंविनि-१०१६/प्र.क्र.६/१६/विनियम, दि. ४ मार्च, २०१६ मधील सूचनेनुसार (२०५२ ००८१) या लेखाशिर्षाखाली दि. ३१.०३.२०१५ यापूर्वीचे तपशीलवार देयक प्रलंबित नाही.

(२) दि. ३१.०३.२०१६ नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशीलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.

(३) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

(४) खर्च नियमत देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

(५) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तीगत जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

(६) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरीता निधी उपलब्ध आहे.

६. वित्त विभागाच्या उपरोक्त मान्यतेनुसार वाहन खरेदीसाठी येणाऱ्या खर्चाचे देयक संक्षिप्त देयकावर काढण्यास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. उपरोक्त खर्च भागविण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री अ. भि. मोरे, कक्ष अधिकारी, कार्यासन-३१ सामान्य प्रशासन विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री स. का. जोंधळे, उप सचिव सामान्य प्रशासन विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. मे. टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रा. लि. मुंबई यांनी Model No. INNOVA CRYSTA २.४Z PACAKAGE: ७ SEATER) (पांढरा रंग) या बनावटीच्या २४ वाहनांचा पुरवठा तात्काळ परिच्छेद-३ मध्ये नमूद केलेल्या संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयातील राजशिष्टाचार कक्षाकडे करावा.

८. जिल्हाधिकारी, सोलापूर, जळगांव, औरंगाबाद, बीड, लातूर, चंद्रपूर, नागपूर, गोंदिया व यवतमाळ यांना कळविण्यात येते की, सदरहू वाहने प्राप्त झाल्यानंतर सदर वाहनांची तात्काळ प्रादेशिक परिवहन अधिकारी कार्यालयाकडून नोंदणी करून घेण्यात यावी.

९. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.७/काषा-प्र-५, दि. १७.०१.२०१७ मधील तरतूदींनुसार सूट देण्यास करण्यास वित्त विभाग /कोषा-प्र-५ यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३/१७/को.प्र.-५, दि. २७.०२.२०१७ अन्वये मान्यता दिली आहे.

१०. याप्रित्यर्थ होणारा खर्च “मागणी क्र. ए-४, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०६) विख्यात अभ्यगंतासाठी वाहन खरेदी -५१ मोटार वाहने सांकेताक क्रमांक २०५२००८१ ” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **सन २०१६-१७** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२०/२०१७/व्यय-४ दि. २०.०३.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. १९-ब नियम क्र. ६९ प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३२७१५१३३०६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Satish K Jondhale

Digitally signed by Satish K Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish K Jondhale
Date: 2017.03.27 15:16:19 +05'30'

**( स. का. जोंधळे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, (राजशिष्टाचार कक्ष) सोलापूर, जळगांव, औरंगाबाद, बीड, लातूर, चंद्रपूर, नागपूर, गोंदिया व यवतमाळ
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
५. कक्ष अधिकारी,कार्यासन-२५ व ३०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी वित्त विभाग, व्यय-४/विनियम/कोषा-प्र-५, मंत्रालय, मुंबई
७. मे. टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रा. लि. मुंबई
८. मे. राजयोग टोयाटो, लातूर
९. निवडनस्ती/(का.३१).